GR200408271439000001.0100

## शासकीय सेवेत अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय,क्रमांक:अकंपा-१००३/प्र.क्र.२५/२००३/आठ,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक: १३ जून, २००३.

संदर्भ:- (१) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:अकंपा-१०९३/२३३५/ प्र.क्र.९०/९३/आठ,दिनांक २६ ऑक्टोबर,१९९४,
(२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:अकंपा-१०९३/२३३५/ प्र.क्र.९०/९३/आठ,दिनांक १२मार्च,१९९७,
(३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:अकंपा-१०००/प्र.क्र.२०/ २०००/आठ,दिनांक २८ मार्च,२००१,
(४) शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक:असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/ वित्तीय सुधारणा,दिनांक १० सप्टेंबर,२००१
(५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:अकंपा-१००१/प्र.क्र.५ २००२/आठ,दिनांक ३० जुलै,२००२
(६) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:अकंपा-१००१/प्र.क्र.५/२००२/आठ, दिनांक: २२ जानेवारी,२००३
(७) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/०३/१२ दिनांक: १० मार्च,२००३

### शासन निर्णय

मागासवर्गीयांसाठी राखीव ठेवलेली पदे/मागासवर्गीयांचा अनुशेष भरुन काढण्याच्या धोरणाचा एक भाग म्हणून ट 'क' व 'ड' मधील शासकीय सेवेतील अनुशेषांच्या पदावर अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठी ठेवण्यात आलेल्या कत्रित प्रतिक्षासूचीतील संबंधित मागासवर्ग प्रवर्गाच्या उमेदवारांची नियुक्ती करण्याबाबतचे निदेश संदर्भाधीन क्रमांक-५ ६ येथील अनुक्रमे दिनांक ३० जुलै,२००२ व २२ जानेवारी,२००३ चे शासन निर्णयाव्दारे देण्यात आले होते.

संदर्भाधीन क्रमांक-४ येथील वित्त विभागाच्या दिनांक १० सप्टेंबर,२००१ च्या शासन निर्णयातील निदेशानुसार कार्यालयातील/विभागातील सर्व पदांचा आढावा पूर्ण होऊन आकृतिबंधास उच्चस्तर सचिव समितीची मान्यता मिळाल्यावर, त्याबाबतचे आदेश निर्गमित झाल्याशिवाय त्या त्या आस्थापनेवरील पदे भरण्यावर निर्बंध घालण्यात आलेले आहेत. सदर निर्बंध अद्यापही कायम आहेत. वर नमूद केलेल्या संदर्भाधीन क्रमांक-५ व ६ येथील शासन निर्णयामुळे अनुकंपा तत्वावरील एकत्रित प्रतिक्षासूचीतील मागासवर्गीय उमेदवारांची राखीव पदांवर नियुक्तीसाठी शिफारस होत असली तरी आकृतिबंध निश्चित झाल्याशिवाय खुल्या प्रवर्गातील उमेदवारांची नियुक्ती करणे शक्य होत नाही. या सर्व परिस्थितीचा विचार करुन शासन आता खालीलप्रमाणे सुधारीत आदेश देत आहे:-

१) संदर्भाधीन क्रमांक- ५ व ६ येथील दिनांक ३० जुलै,२००२ आणि २२ जानेवारी,२००३ चे शासन निर्णय आता रद्द करण्यात येत आहेत. त्याऐवजी शासन असे आदेशित करीत आहे की, ज्या विभागांच्या/कार्यालयांच्या पदांचा आढावा पूर्ण झालेला आहे आणि उच्चस्तर सचिव समितीने आकृतीबंध मान्य केलेला आहे त्या विभागातील/कार्यालयातील गट 'क' व 'ड' च्या एकूण पदसंख्येपैकी ५ टक्के एवढी पदे अनुकंपा नियुक्तीने भरता येतील.

२) ही ५ टक्के पदे भरतांना ती संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक १२ मार्च,१९९७ च्या शासन निर्णयाव्दारे विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार संबंधित एकत्रित प्रतिक्षासूचीतील क्रमानुसार शिफारशी करुन भरण्यात यावीत. ही ५ टक्के पदे भरतांना मागासवर्गीय किंवा अमागासवर्गीय असा भेदाभेद न करता प्रतिक्षासूचीतील क्रमानुसारच भरण्यात यावीत.

३) वरीलप्रमाणे मंजूर आकृतीबंधाच्या अनुषंगाने गट 'क' व 'ड' ची केवळ ५ टक्के पदे भरण्यास शासनाने मान्यता दिली असल्याने संदर्भाधीन क्रमांक-३ येथील दिनांक २८ मार्च,२००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद

१(ड) मध्ये नमूद करण्यात आल्याप्रमाणे अशा नियुक्त्या करण्यापूर्वी 'शासनाची पूर्व मान्यता घेण्याची' आवश्यकता राहणार नाही. त्यामुळे सदर अट रद्द करण्यात येत आहे..

३. मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने याचिका क्रमांक:४/२००० आणि ८३/२००३ चे संदर्भात दिनांक २८ फेब्रुवारी,२००३ रोजी दिलेल्या निर्णयानुसार रोजगार हमी योजनेतील सर्व हजेरी सहाय्यकांचे नियोजन विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-हसका-१३९४/प्र.क्र.१८५/रोहयो-३,दिनांक १ डिसेंबर,९५ च्या आदेशानुसार शासन/जिल्हा परिषद/पंचायत समित्यांच्या सेवेतील वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावरील समावेशन पूर्ण होईपर्यंत तांत्रिक व शिक्षण सेवक/सहायक शिक्षक ही पदे वगळून वर्ग ३ व ४ मधील अन्य पदे भरण्यास जी स्थगिती दिलेली आहे; ती स्थगिती उठल्यावर/शिथिल झाल्यावर वरीलप्रमाणे अनुकंपा तत्वावरील नियुक्त्या करता येतील. तथापि, जोपर्यंत ही स्थगिती शिथील होत नाही तोपर्यंत संदर्भाधीन क्रमांक-७ येथील दिनांक १० मार्च,२००३ चे वर्ग-३ व ४ मधील अतांत्रिक पदे भरण्यावरील स्थगितीचे आदेश यापुढेही अंमलात राहतील.

४. सदर शासन निर्णय,वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक:४०१/०३/विसू-१,दिनांक ९ मे,२००३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

प्रकाश लोखंडे
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
* राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालयासमोर,मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

* पत्राने.

एच-344(5000-6-03)13अ.